# किर्लोस्कर संगीत मंडळी.



जुने व नवे

## प्रमुख नट, नाटककार, व स्मरणीय पात्रें.

हें पुस्तक "चित्रशाळा" छापखान्यांत
रा. शंकर बापूजी मुजुमदार यांनीं 'किर्लोस्कर संगीत
मंडळीकरितां' छापून प्रसिद्ध केलें.

सन १९०८

आवृत्ति २ री.

# रंगभूमि.

—०—

सदर सचित्र मासिक पुस्तक नाटक विषयाला वाहिलें आहे. यांत वाङ्मय, अभिनय आणि इतिहासदृष्ट्या महत्त्वाचे व विद्वान् लेखकांचे निबंध व प्रसिद्ध महाराष्ट्रीय नाटककारांचीं सचित्र चरित्रें प्रसिद्ध होत असतात. पुस्तकाचीं पृष्ठें ४८. टपाल खर्चासह वर्गणी २।। रुपये. प्रत्येक अंकांत चित्रें असतात. पहिल्या वर्षाचीं पुस्तकें बांधून तयार आहेत.

सेक्रेटरी,

कि. सं. मंडळी.

———



**अण्णासाहेब ( बळवंत पांडुरंग ) किर्लोस्कर**—जन्म सन १८४३ मृत्यू १८८५. महाराष्ट्र संगीत नाट्यकलेचे उत्पादक. यांनी एक पांच वर्षांत नाट्यकलेंत मोठी क्रांति करून सोडली; नाटकाचे पूर्वस्वरूप फार बदलून टाकलें; कवि, गाणारे व ग्रंथकार यांना उदयास आणलें; व समाजांत एक नवी करमणूक उत्पन्न केली. पूर्व वयांत 'अल्लाउद्दीनांची चितुर शहरावर स्वारी' व 'शंकरदिग्विजय' हीं दोन गद्य नाटकें, नंतर शाकुंतल, सौभद्र, व रामराज्यवियोग, अशीं तीन अत्यंत लोकप्रिय झालेलीं संगीत नाटकें लिहिलीं. यांचें चरित्र पुस्तक रूपानें प्रसिद्ध आहे.



**मोरोबा बापुजी वाघुलीकर**—राहणार वाई प्रांतांतील वाघुली गांव हे मुळचे गवयी होते. अण्णासाहेबांच्या कल्पनेला यांचें साह्य मिळाल्यामुळेंच "किर्लोस्कर संगीत मंडळी" ही संस्था उदयास येऊन उर्जित अवस्थेला आली. सुमारें १८ वर्षें यांनीं हजारों लोकांचें मनोरंजन केलें. हे उत्तमांतले नट होते. धंदा सोडल्यावर सुमारें १० वर्षें यांनीं स्नानसंध्येंत उत्तम काळ घालविला. किर्लोस्कर मंडळी त्यांच्या मेहनतीचें श्रेय त्यास देत होती. ता० २० जानेवारी १९०८ रोजीं वाई मुक्कामी हे परलोकवासी झाले. मरणसमयीं यांचें वय साठ पासष्ट वर्षांचें होतें.



**बाळकोबा ( बाळकृष्ण नारायण ) नाटेकर**--हे मूळचे पुण्यांतील प्रसिद्ध गवयी होते. मोरोबाप्रमाणें अण्णासाहेबांच्या संस्थेचे हे खांब होते व कांहीं दिवस यांनीही हजारों लोकांस आपल्या गायनानें व नाट्यकलेनें झुलविलें आहे. यांनीं रंगभूमी सोडून पुष्कळ दिवस झाले तरी यांची कण्व व कृष्ण या भूमिका लोकांच्या डोळ्यासमोर आहेत. गायनवादनकलेंत हे निष्णात आहेत. यांनीं रंगभूमी सोडून १५ वर्षे झाली, तरी 'किर्लोस्कर' मंडळीचा अभिमान सोडला नाहीं. यामुळें यांना मंडळी फार मान देत आहे. हे हल्ली पुण्यांतील ट्रेनिंग कॉलेजमध्यें गायनवर्गाचे शिक्षक आहेत.



**भाऊराव [ लक्ष्मण बापुजी ] कोल्हटकर**--नाट्यकलेंत हें एक अद्वितीय रत्न व शिरोभूषण होऊन गेलें. नाटेकर, मोरोबा व कोल्हटकर या रंगभूमीवर जणूं मूर्तिमंत रंगदेवता असत. हे गावयास लागले म्हणजे नागाप्रमाणें लोकांस डुलवीत होते. अशा तऱ्हेनें अव्याहत १८ वर्षें यांनीं मंडळीची सेवा व लोकांचें रंजन केलें आहे. हे उदर रोगानें ३८ वे वर्षीं मृत्युमुखीं पडले. यांच्या मृत्यूमुळें महाराष्ट्र भाषा जाणणारा सर्व देश हळहळला. यांनीं दोन हजार रुपये आपल्या नांवानें काढून ठेवले होते. त्यांच्या व्याजांत त्यांच्या ट्रस्टीनें बडोदा हायस्कुलांत म्याट्रिक्युलेशनच्या परिक्षेंत पहिला येणाऱ्या उमेदवारास एक स्कालरशिप ठेवली आहे. यांचें चारित्र प्रसिद्ध झालें आहे.



**रामभाऊ ( रामचंद्र विठ्ठल ) किंजवडेकर**—हे प्रथम १८८४ त मंडळींत आले. अण्णासाहेबांचे पश्चात् मंडळीचे चालकांपैकीं हे एक झाले; अण्णासाहेबांच्या सर्व भूमिका हे करीत असत. यांचें गाणें व अभिनय पद्धतशीर असे. मोरोबा व भाऊराव ही जुनी मंडळी कमी झाल्यावर यांनींही रंगभूमीवर काम करण्याचें सोडलें.



**गोविंद बल्लाळ देवल.**—सांगलीजवळ हरीपूर येथील राहणारे महाराष्ट्र भाषेंतील हे सुप्रसिद्ध व लोकप्रिय नाटककार आहेत. यांचीं दुर्गा, झुंझारराव, व फाल्गुनराव, हीं गद्य नाटकें, व विक्रमोर्वशीय, मृच्छकटीक, शापसंभ्रम, व शारदा हीं संगीत नाटकें प्रसिद्ध आहेत. किर्लोस्कर मंडळी शारदा नाटकाचा प्रयोग करूं लागल्यापासून त्या नाटकानें समाजांत बरीच चळवळ उडवून दिली आहे; व जें काम वर्तमानपत्राच्या कित्येक दिवसांच्या ओरडीनें व लोकांच्या उपदेशानें झालें नाहीं तें काम यांच्या शारदा नाटकानें करून 'बालावृद्ध' विवाह हा रूढ प्रकार निंद्य व उपहासास्पद करून ठेवला आहे. यांची कविता साधी, रसाळ व सुबोध असते. यांनीं आपल्या कुटुंबाचे नांवानें तीनहजार रुपये अनाथबालिकाश्रमास दिले आहेत.





**श्रीपाद कृष्ण कोल्हटकर. बी. ए. एल. एल. बी.**—यांचीं वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार इत्यादि संगीत नाटकें प्रसिद्ध आहेत. याशिवाय वि. ज्ञा. वि. व मासिक मनोरंजन इत्यादि मासिक पुस्तकांतून यांचे लेख व कविता प्रसिद्ध होत असतात. यांचे लेख फार मार्मिक व विनोदपर असतात. यांनीं नाटकें व निबंध लिहिण्याची स्वतंत्र दिशा काढिली असून संविधानकवैचित्र्य, अभिनव कविकल्पना, व उदात्त विचार, या गुणांत यांचीं नाटकें अग्रगण्य आहेत. रसिक व विद्वान् लोक ह्यांचीं नाटकें फार पसंत करतात. यांनीं आणखी एक पांचवें नाटक लिहिलें आहे, परंतु तें अद्याप प्रसिद्ध झालें नाहीं. यांनीं आपल्या गुप्तमंजूष व मूकनायक नाटकांच्या पुस्तकांचें उत्पन्न अनाथबालिकाश्रमास दिलें आहे.





**पुरुषोत्तम भास्कर डोंगरे.**—यांचीं भीमासिंग व पद्मिनी व जरठोद्वाह हीं गद्य आणि चंद्रसेना व चंद्रहास हीं दोन संगीत नाटकें प्रसिद्ध आहेत. हे पूर्वी कुलाबा जिल्ह्यांत सरकारी नोकर होते; परंतु आपल्या हातून कांहींतरी देशसेवा घडावी म्हणून त्यांनीं ती नोकरी सोडली. परंतु दुर्दैवानें त्यांच्या उद्देशाचें फळ त्यांना मिळालें नाहीं. हे गेल्या डिसेंबर महिन्यांत परलोकवासी झाले.

**शंकर विष्णु कुळकर्णी. बी. ए.** यांनीं "सुमति" नांवाचें नाटक लिहिलें असून नाटकाचें विषयास नवीन दिशा दिली आहे.







**नारायण दत्तात्रय जोगळेकर.**--यांचें इंग्रजी शिक्षण व गायनाचें शिक्षण बरोबरच चाललें होतें. म्याट्रिक्युलेशनची परीक्षा उतरल्यावर हे वकीलीचा अभ्यास करण्याकरितां पुण्यास येऊन राहिले. याच सुमारास भाऊराव यांची प्रकृति बिघडून ते आजारी पडल्यामुळे किर्लोस्कर मंडळी लयास जाण्याची भीति होती. अशा वेळीं यांची मदत मिळाल्यामुळें किर्लोस्कर मंडळीची पुन्हां उभारणी झाली. सन १९०० मध्यें हे या मंडळींत आले. मंडळीचे हल्लीं हे एक चालक व मुख्य नायक आहेत.

---



**काशीनाथ वासुदेव परचुरे.**--राहणार वाई. सुमारें २६ वर्षें किर्लोस्कर मंडळींतील विनोदी कामांतले हे प्रसिद्ध नट आहेत.





**नारायण सदाशिव दडपे.**--हे बऱ्यांतले नट असून, यांनीं अण्णासाहेबांच्या स्मारकाप्रीत्यर्थ अनाथबालिकाश्रमास १०० रु० दिले आहेत. हे सुमारें २४ वर्षें या संस्थेत आहेत.



**गणेश गोविंद बोडस**—हे या मंडळींत १३ वर्षें आहेत. श्रमानें व अभ्यासानें हे प्रस्तुत एक उत्तमांतले नट तयार झाले आहेत.





**चिंतामण रामचंद्र दिवेकर**—हे सासवडचे राहणारे. हे चांगल्यापैकीं हरकामी नट असून प्रसंगीं पाहिजे ती भूमिका योग्य रीतीनें वठवितात. हे सुमारें १६ वर्षें या संस्थेंत आहेत.



**रामा बाळनाथ बेडगकर.**—हे ११ वर्षें किर्लोस्कर मंडळींत असून नायिका व उपनायिकेच्या भूमिका करीत असतात. यांचा आवाज संगिताला योग्य असा आहे.



**नारायण श्रीपाद राजहंस.**—यांचें गाणें शास्त्रोक्त व मोहक असून सौंदर्य व कंठमाधुर्यामुळें यांना बालपणापासून 'बालगंधर्व' असें म्हणतात. यांच्या सौभद्र, मूकनायक इत्यादि नाटकांतील नायिकेच्या भूमिका वाखाणण्यासारख्या होतात.



**रामा बाळनाथ बेडगकर.**—हे ११ वर्षें किर्लोस्कर मंडळींत असून नायिका व उपनायिकेच्या भूमिका करीत असतात. यांचा आवाज संगिताला योग्य असा आहे.



**नारायण श्रीपाद राजहंस.**—यांचें गाणें शास्त्रोक्त व मोहक असून सौंदर्य व कंठमाधुर्यामुळें यांना बालपणापासून 'बालगंधर्व' असें म्हणतात. यांच्या सौभद्र, मूकनायक इत्यादि नाटकांतील नायिकेच्या भूमिका वाखाणण्यासारख्या होतात.



**त्र्यंबक नारायण साठे.**—मूळचे कर्जत तालुक्यांतील राहणारे. किर्लोस्कर मंडळीच्या पहिल्या भरभराटींत सुमारें ८ वर्षें हे सेक्रेटरी होते. मंडळीला सुव्यवस्थेचें वळण यांनींच लावून दिलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्यांच्या हुषारीमुळें ह्यांना मिरज संस्थानांत म्यु॰ सेक्रेटरीची जागा मिळून सांप्रत जमखिंडी संस्थानांत हे मामलतीवर आहेत.

**भास्कर रघुनाथ ऊर्फ भास्करबोवा बखले.**-हे किर्लोस्कर मंडळीच्या पहिल्य दहा वर्षांच्या कारकीर्दींत प्रमुखांपैकीं नट होते. यांचा जन्म शके १७९१ मध्यें झाला असून हे बालवयांत सुमारें ४ वर्षें मंडळींत होते. नाटकांतून निघाल्यावर यांनीं अवाज सुधारण्याची जीवापाड मेहनत करून बडोद्याचे प्रसिद्ध गवई फैजमहंमद यांच्या जवळ गाण्याचा अभ्यास केला; व हल्लीं हे हिंदुस्थानांतल एक नामांकित गवई म्हणून उदयास आले आहेत. मुसलमान लोकांतच गाण्याची विद्या वसते अशा समजुतीला यांनीं अपवाद आणला आहे.





**विठ्ठल अच्युत जांभेकर**--गोव्याकडचे राहणारे असून मंडळीच्या भरवशाचीं जीं माणसें आहेत, त्यांत हे प्रमुख होते. हजारों रुपयांचा कारभार मंडळीनें ह्यांच्या हवालीं केला होता; व तो उत्तम प्रकारें करून मंडळीचें हित पाहण्यांत त्यांनीं आपल्या आयुष्याचीं वीस वर्षें खर्च केलीं. दोनवर्षांखालीं हे क्षयाच्या आजारानें वयाच्या ३८ व्या वर्षीं वारले.





**गोविंद नारायण निपाणीकर.**—रंगभूमी-कडच्या व्यवस्थेचें काम यांच्याकडे २२ वर्षें होतें. हल्लीं हे मंडळीचे पेन्शनर आहेत.





**कृष्णाजी रघुनाथ जोशी** ऊर्फ **कृष्णापा.**-राहणार बार्शी. मंडळींत हे अत्यंत उपयोगीं गृहस्थ आज २२ वर्षें आहेत.



**शंकर बापूजी मुजूमदार**—मोरोबा बाळकोबा यांच्या बरोबरच संस्थेच्या आरंभाला हेही अंशतः उपयोगी पडले असून हल्लीं मंडळीच्या सेक्रटरीचें काम करीत आहेत. अण्णासाहेब व भाऊराव यांचीं चरित्रें यांनींच लिहिलीं आहेत. प्रस्तुतच्या किर्लोस्कर संगीत मंडळींत अगदीं अव्वल कारकीर्दीतल्या मंडळीपैकीं हेच एक अवशेष राहिले आहेत.